**प्रकाशा-बुराई उपसा सिंचन योजना ता. जि.नंदुरबार प्रकल्पास प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०१९/६३८/(प्र.क्र.२०३/१९)/मध्यम प्रकल्प**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- १५ मार्च, २०२४**

**संदर्भ:-१)** कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव, यांचे निर्णय क्र. तापाविम/ कासं/ प्रवि/ प्रमा ६९/९९ दि. ०२.०२.१९९९

**२)** कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव, यांचे पत्र जा.क्र.कास/तापाविम/प्रशा-२/४२९/२०२४ दि.३०/०१/२०२४

**प्रस्तावना:-**

प्रकाशा-बुराई उपसा सिंचन योजना ता.जि. नंदुरबार तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव अंतर्गत नंदुरबार जिल्ह्यातील नंदुरबार तालुक्यातील हाटमोहिदा गावाजवळून तापी नदीतून अस्तित्वातील प्रकाशा बॅरेजच्या उर्ध्व बाजूमधील पूराचे पाणी उपसा करुन सिंचनासाठी ४ टप्प्यात वापरण्यात येणार आहे. सदर प्रकल्प तापी खोऱ्यातील अवर्षण प्रवण क्षेत्रातील आहे. सदर प्रकल्पामुळे नंदुरबार जिल्ह्यातील नंदुरबार तालुक्यातील ४३५१ हे. व धुळे जिल्ह्यातील शिंदखेडा तालुका २७३४ हे. असे एकूण ७०८५ हे. क्षेत्र सिंचित होणार आहे.

प्रकाशा-बुराई उपसा सिंचन योजना प्रकल्पास महामंडळ निर्णय क्र. तापाविम/ कासं/ प्रवि/प्रमा ६९/९९ दि.०२.०२.१९९९ अन्वये रु.११०.१० कोटी (दरसूची १९९७-९८) मूळ प्रशासकिय देण्यात आली आहे. प्रकाशा- बुराई उपसा सिंचन योजनेत तापी नदीतून प्रकाशा बॅरेजेच्या उर्ध्व बाजूस पावसाळयात पुराचे वाहून जाणारे पाणी हाटमोहिदा गावाजवळील तापी नदीच्या डाव्या तिरावरुन इनटेक चॅनल व जॅकवेल बांधुन उपसा व्दारे ४१.४७ दलघमी पाणी उचलणे प्रस्तावित आहे.

प्रकाशा-बुराई उपसा सिंचन योजनेच्या मूळ प्रशासकीय अहवालानुसार उ.सि.यो च्या टप्पा क्र. १ मध्ये प्रकाशा बॅरेज मधून अस्तित्वातील वडवद लपा तलाव पाणी टाकणे, टप्पा क्र.२ वडवद ते ठाणेपाडा लपा तलावात पाणी टाकणे, टप्पा क्र. ३ मध्ये ठाणेपाडा ते शेवट ५६० तलांक पाणी टाकणे, टप्पा क्रमांक ४ सब लाईन ठाणेपाडा ते शनिमांडळ, शनिमांडळ ते बुराई धरण, बुराई धरण ते अमलपाडा पाणी साठविण्याचे प्रस्तावित होते.

प्रस्तावित प्रथम सु.प्र.मा. प्रस्तावात ठाणेपाडा वडवद मध्ये पाणी टाकण्याऐवजी नव्याने आसाने व निंभेल साठवण तलाव बांधणे प्रस्तावित आहे. त्याचप्रमाणे बुराई मध्यम प्रकल्पाऐवजी अमरावती नाला ल.पा. प्रकल्पात २.६६ दलघमी, अमरावती मध्यम प्रकल्पात १०.०० दलघमी व वाडी-शेवाडी मध्यम प्रकल्पात ६.०० दलघमी प्रस्तावित करण्यात आले असून त्यामुळे बुराई मध्यम प्रकल्पाची उंची वाढविण्याचे रद्द करण्यात आले आहे. याबाबत नियामक मंडळाच्या दिनांक ०६/०६/२०१८ च्या बैठकीत ठराव क्र. ५६.९ नुसार मान्यता आहे.

या उपसा सिंचन योजनेअंतर्गत नव्याने बांधण्यात येणाऱ्या निभेंल व आसाने साठवण तलावाचे सिंचन क्षेत्र बंद नलिका वितरण व्यवस्थेद्वारे सिंचीत करावयाचे प्रस्तावित आहे. इतर

अस्तित्वातील ल.पा.योजना व मध्यम प्रकल्पाचे या उपसा सिंचन योजनेअंतर्गतचे सिंचन क्षेत्र त्या प्रकल्पांच्या अस्तित्वातील वितरण व्यवस्थेद्वारा सिंचीत करावयाचे प्रस्तावित आहे. निंभेल व आसाने या नविन साठवण तलावाची तसेच ल.पा.यो शनिमांडळ व बुराई मध्यम प्रकल्पाचे वाढीव व साठवण क्षमता सिंचन क्षमता खालील प्रमाणे आहे.

| टप्पा क्र. | धरणाचे नांव | मंजूर मुळ प्रमा नुसार | | प्रस्तावित प्रथम सुप्रमा नुसार | |
|---|---|---|---|---|---|
| | | साठवण क्षमता दलघमी | सिंचन क्षेत्र (हे) | साठवण क्षमता दलघमी | सिंचन क्षेत्र (हे) |
| १ | साठवण तलाव निंभेल | ०.०० | ०.०० | ७.०५ | १२०४ |
| २ | साठवण तलाव आसाने | ०.०० | ०.०० | १३.६९ | २३३९ |
| ३ | ल.पा.योजना शनिमांडळ | २.०७ | ३५४ | २.०७ | ३५४ |
| ४ | बुराई मध्यम प्रकल्प | १८.६६ | ३१८८ | ०.०० | ०.०० |
| ५ | वाडीशेवाडी मध्यम प्रकल्प | २०.७४ | ३५४३ | ६.०० | १०२६ |
| ६ | अमरावती मध्यम प्रकल्प | ०.०० | ०.०० | १०.०० | १७०८ |
| ७ | ल.पा.यो. अमरावतीनाला | ०.०० | ०.०० | २.६६ | ४५४ |
| | **एकूण** | **४१.४७** | **७०८५** | **४१.४७** | **७०८५** |

टिप: या प्रकल्पातील एकूण सिंचन क्षेत्र ७०८५ हे. पैकी नवीन क्षेत्र ३१८८ हे. स्थिरीकरण करणे प्रस्तावित आहे.

दरम्यानच्या काळात दरसुचीतील बदलामुळे, भूसंपादन किंमतीतील वाढ, जादा दराची निविदा स्विकृतीमुळे झालेली वाढ, इतर कारणांमुळे झालेली वाढ, अनुषंगिक खर्चात झालेली वाढ इत्यादी कारणांमुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ झाल्यामुळे कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांनी सन २०२२-२३ च्या दरसुचीवर आधारीत रुपये ७९३.९५ कोटी किंमतीचा प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

सदर प्रकल्पाची मूळ प्रशासकीय मान्यता किंमत रुपये ११०.१० कोटी असून प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता किंमत रुपये ७९३.९५ कोटींच्या तुलनेत रुपये एकूण वाढ रू.६८३.८५ कोटी, (६२१.१२%) ने जास्त आहे.

प्रकल्पाचे लाभव्यय गुणोत्तर १.४० इतके आहे. (मापदंड १.०० पेक्षा जास्त, अवर्षण प्रवण क्षेत्र) प्रकल्प मापदंडात बसत आहे. प्रकल्पाचा आर्थिक परतावा दर (ERR) १६.३३ आहे.

या प्रकल्पाच्या प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता छाननी अहवाल प्रस्ताव दि.०६/०२/२०२४ रोजीच्या उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांच्या स्तरावरील व्यय अगक्रम समितीसमोर विचारार्थ सादर करण्यात आला होता व त्यास समितीची मान्यता प्राप्त झाली आहे.

समितीने बांधकामाची सद्य:स्थिती, किंमत वाढीची कारणमीमांसा इ.बाबींचा परामर्श घेऊन प्रकाशा-बुराई उपसा सिंचन योजना ता.जि. नंदुरबार या प्रकल्पास सन २०२२-२३ च्या दरसुचीवर आधारित रुपये ७९३.९५ कोटी किंमतीच्या प्रथम सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार प्रकाश-बुराई उपसा सिंचन योजना ता. जि.नंदुरबार प्रकल्पास प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सबब, शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

प्रकाशा-बुराई उपसा सिंचन योजना ता.जि. नंदुरबार या प्रकल्पास सन २०२२-२३ दरसुचीवर आधारित रुपये ७९३.९५ कोटी (रुपये सातशे त्र्यान्नव कोटी पंच्यान्नव लक्ष फक्त) किंमतीच्या प्रथम सुधारित प्रकल्प अहवालास या शासन निर्णयाद्वारे प्रशा्सकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये ७३८.४३ कोटी (रुपये सातशे अडोतीस कोटी त्रेचाळिस लक्ष फक्त) कामाप्रित्यर्थ तसेच आस्थापना व अनुषंगिक खर्चासाठी रुपये ५५.५२ कोटी (रुपये पंचावन्न कोटी बावन्न लक्ष फक्त) तरतूद असून उपशिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा सोबत जोडण्यात येत आहे.

२. या योजनेस प्रदान केलेली प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवही मध्ये अनुक्रमांक ०८/२०२४ वर नोंदवण्यात आली आहे.

३. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यता तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

४. या प्रकल्पाच्या कामावर होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष आय-५, ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (०२) योजनांतर्गत, (०२) (०१) तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव भागभांडवली अंशदान (४७०१-एच ७२९) या लेखाशिर्षाखाली टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यताखालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

५.१) सर्व वैधानिक मान्यता प्राप्त केल्याखेरीज काम सुरु करु नये.

५.२) नलिका वितरण प्रणालीचे संकल्पन मध्यवर्ती संकल्प चित्र संघटनेकडून तपासून घ्यावे.

तदनंतर नलिका वितरण अथवा खुला कालवा या पर्यायांपैकी किफायतशीर पर्याय कार्यकारी संचालक यांनी प्रमाणित करुन निवडावा.

५.३) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेशकरु नये. तसेच यापुढे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ होणार नाहीत, याची दक्षता घ्यावी.

५.४) प्रकल्पाचीकामे जुन २०२७ पर्यंत व सुधारित प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्याची दक्षता महामंडळाने घ्यावी.

५.५) पाणीसाठ्याचा सिंचनाकरिता जास्तीत जास्त लाभ होईल अशाप्रकारे कामांचा प्राधान्यक्रम निश्चित करण्यात यावा व त्यानुसार कामे / निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

५.६) संपूर्ण लाभक्षेत्रामध्ये पाणीवापर संस्था स्थापन करुन सिंचन व्यवस्थापन पाणीवापर संस्थेस हस्तांतरित करावे.

५.७) सदर योजनेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. यासंदर्भात प्रचलित शासन निर्णय, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी. आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निदेशांचे व त्रुटींची पूर्तता करणे याची सर्वस्वी जबाबदारी महामंडळाची राहील.

५.८) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय, क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी घेतलेल्या विविध निर्णयास व क्षेत्रिय अनियमितता झाली असल्यास अशा अनियमिततेस मान्यता असल्याचे गृहीत धरली जाणार नाही. अशा प्रकरणांची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी महामंडळाची राहील.

५.९) या योजनेबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पुढे चालू ठेवावी. सदर सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे सध्या सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने आणि व्यय अग्रक्रम समितीच्या दि.०६/०२/२०२४ रोजी झालेल्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३१६१३३३३८९६२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सहपत्र :- उपशीर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2024.03.16 13:42:46 +05'30'

**(प्रवीण कोल्हे)**
शासनाचे उप सचिव

**प्रत, सहपत्रांसह :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल-१/२(लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
१३) मुख्य अभियंता (द.व प्र.) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव.
१५) उप सचिव (मो.प्र-१/मो.प्र-२/जसं/निवसं/सिंव्य/लाक्षेवि/लपा/जवि),यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) अधीक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे.
१८) कार्यकारी अभियंता, नंदुरबार मध्यम प्रकल्प विभागीय पथक, नंदुरबार.
१९) वित्तविभाग (व्यय-१२/अर्थ-०२/अर्थ-१०/व्यय-६ अ ), मंत्रालय, मुंबई.
२०) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.
२१) मध्यम प्रकल्प कार्यासन संग्रहार्थ.

**उप शिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**
**प्रकाश-बुराई उपसा सिंचन योजना ता. जि.नंदुरबार प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता**
**शासन निर्णय क्रमांक :-** सुप्रमा-२०१९/६३८/(प्र.क्र.२०३/१९)/मध्यम प्रकल्प
**दिनांक :- १५ मार्च, २०२४ चे सहपत्र.**

**(किंमत रुपये कोटी)**

| अ.क्र. | उपशिर्ष | मुळ मंजूर सुप्रमा नुसार (दरसूची १९९९-२०००) | प्रस्तावित प्रथम सुप्रमानुसार (दरसूची २०२२-२३) | वाढ/घट |
|---|---|---|---|---|
| १ | अ- प्राथमिक | ०.०८ | ३.७५ | ३.६७ |
| २ | ब- भूसंपादन | १.०१ | ९१.५८ | ९०.५७ |
| ३ | सी- कामे | ९७.६६ | ५०५.५० | ४०७.८४ |
| ४ | डी-विमोचक | ०.० | २.१५ | २.१५ |
| ५ | ई-प्रपात<br>एफ आर एच टी- कामे<br>जी-पूल<br>एच-अतिवाहिका | ०.२२ | ६२.४२ | ६२.२० |
| ६ | के- इमारती | १.४६ | ४.८ | ३.३४ |
| ७ | एम-वृक्षारोपण | ०.२६ | १.५९ | १.३३ |
| ८ | ओ-किरकोळ कामे | ०.३४ | २५.६७ | २५.३३ |
| ९ | पी- व्यवस्थापन | ०.२७ | ५.८ | ५.५३ |
| १० | क्यू- हत्यारे व अवजारे | ०.३ | २.३८ | २.०८ |
| ११ | आर- दळणवळण | १.५७ | ५.७९ | ४.२२ |
| १२ | एस-उर्जा (Power Electrical Energy | २.७१ | २७.०० | २४.२९ |
| | **एकूण कामाची किंमत** | **१०५.८८** | **७३८.४३** | **६३२.५५** |
| | **अनुषंगिक खर्च** | ४.२२ | ५५.५२ | ५१.३ |
| | **एकूण प्रकल्पिय किंमत** | **११०.१०** | **७९३.९५** | **६८३.८५** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचनक्षेत्र (ICA) ७०८५ हेक्टर आहे.

ब) लाभव्यय गुणोत्तर- १.४० (१.०० पेक्षा जास्त) (अवर्षण प्रवण)

क) आर्थिक परतावादर (ERR)-१६.३३

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2024.03.16 13:43:10 +05'30'

**(प्रवीण कोल्हे)**
शासनाचे उपसचिव